सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियानांतर्गत केंद्र शासनामार्फत वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य शासनाच्या हिश्श्याचा निधी वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांक: एनयुएल-२०१५/प्र.क्र.३०(२)/नवि-३४

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १३ मार्च, २०१५.

**वाचा -**

१) केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व दारिद्र्य निर्मुलन मंत्रालयाचे आदेश एफ क्रमांक जी-२४०११/४/२०१४-UPA (Pt५) FTS: ११४१९, दिनांक १९.१२.२०१४
२) केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व दारिद्र्य निर्मुलन मंत्रालयाचे आदेश एफ क्रमांक जी-२४०११/४/२०१४-UPA (Pt५) FTS: ११४१९, दिनांक २३.१२.२०१४
३) शासन निर्णय क्रमांक: एनयुएल-२०१४/प्र.क्र.१०४/नवि-३३ दिनांक २८/०८/२०१४

**प्रस्तावना -**

केंद्र शासन पुरस्कृत सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेची पुनर्रचना करून त्याचे “राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियान” मध्ये रुपांतर करण्यात आले असून राज्यामध्ये सदर अभियानाची अंमलबजावणी संदर्भीय क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत शहरी गरीब कुटुंबातील व्यक्तींना कौशल्य विकास प्रशिक्षण देऊन रोजगाराची किंवा स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करून देणे, नागरी बेघरांना मुलभूत सेवा उपलब्ध असलेल्या निवाऱ्याची सुविधा उपलब्ध करणे, नागरी भागातील फेरीवाल्यांच्या उपजीविका संबंधी समस्या सोडविणे, शहरी गरीब कुटुंबांच्या राहणीमानाचा दर्जा सुधारून शहरी दारिद्र्य कमी करणे इत्यादी उपाययोजना करण्यात येणार आहेत.

०२. राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियान राबविण्यासाठी केंद्र शासन व राज्य शासन यांचा ७५ : २५ या प्रमाणात वित्तीय आकृतीबंध ठरविण्यात आला आहे. सदर योजनेसाठी उपरोक्त संदर्भाधीन १ व २ नुसार केंद्र शासनाने सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी केंद्र शासनाचा हिस्सा म्हणून रूपये १२४.७३३९ कोटी इतका निधी राज्य शासनास वितरित करण्यात आला आहे.

०३. राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियान राबविण्यासाठी केंद्र शासनाने वितरीत केलेल्या रुपये १२४.७३३९ कोटीच्या प्रमाणात परंतु सद्य:स्थितीत अर्थसंकल्पीय तरतुदीच्या मर्यादेत राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रूपये १९.०० कोटी एवढा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियान राबविण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील आदेशान्वये सन २०१४-१५ या अर्थिक वर्षाकरिता रूपये १२४.७३३९ कोटीचा निधी वितरीत केलेला आहे. केंद्र शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात परंतु सद्य:स्थितीत अर्थसंकल्पीय तरतुदीच्या मर्यादेत राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रूपये १९.०० कोटीचा निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** सदर निधी आहरित करण्यासाठी सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय तथा राज्य अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियान यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रक्कमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पूर्व), मुंबई येथे सादर करून धनादेश प्राप्त करून घ्यावा.

**०३.** या प्रयोजनासाठी होणारा खर्च हा नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-३, २२३०, कामगार व सेवायोजन, ०२, सेवायोजन सेवा, १०१ सेवायोजन सेवा, ०३, नागरी सेवायोजन व उपजीविका कार्यक्रम, (०३) (०२) राष्ट्रीय नागरी उपजीविका अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (योजनांतर्गत), (राज्य हिस्सा २५%) (२२३०६०५६) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील सन २०१४-१५ करिता मंजूर उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०४.** सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: अनौ-८४/व्यय-३, दिनांक १३.०२.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१६१२२९३२५९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2015.03.16 13:30:33 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२, नागपूर
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू.), मुंबई
१०. मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१२. आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई तथा नोडल एजन्सी
१३. उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. उप सचिव (नवि-५), रोख शाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवडनस्ती, नवि-३३